विकास योजना - गडचिरोली
मौजा गडचिरोली येथील सर्वे क्र. ५७७/१ (नविन सर्वे क्र. ७३५) मधील क्षेत्र ना विकास विभागातून वगळून रहिवास विभागात समाविष्ट करणेबाबत कलम ३७(२) अन्वये मंजूरी..

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. टिपीएस-२४०८/२२२५/प्र.क्र.६२/०९/नवि-९**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक: ७ एप्रिल, २०१०**

**शासन निर्णय** :- सोबतची अधिसूचना (मराठी व इंग्रजी) महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रात प्रसिध्द करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(प्रदीप गोहिल)
कार्यासन अधिकारी

प्रति,
१) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
२) संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) जिल्हाधिकारी, गडचिरोली
४) उपसंचालक, नगर रचना, नागपूर विभाग, नागपूर,
(त्यांना विनंती की, मंजूर फेरबदल दर्शविणाऱ्या भाग नकाशाच्या तीन प्रती अधिप्रमाणित करण्यासाठी शासनास सादर कराव्यात व मंजूर फेरबदलाच्या अटी देखील त्यावर स्पष्टपणे नमूद कराव्यात.)
५) नगर रचनाकार, गडचिरोली शाखा, गडचिरोली
६) मुख्याधिकारी, गडचिरोली नगर परिषद, जि. गडचिरोली
७) व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय नागपूर जिल्हा नागपूर
(त्यांना विनंती की, सोबतची अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रात नागपूर विभागीय पुरवणी भाग-एक मध्ये प्रसिध्द करुन त्यांच्या १० प्रती प्रत्येकी ह्या विभागास व संचालक नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे -१ यांना पाठवाव्यात)
८) कक्ष अधिकारी, नवि २९, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
(त्यांना विनंती करण्यात येते की, सोबतची अधिसूचना विभागाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करावी.)
९) निवडनस्ती (कार्यासन नवि-९)

Adhisuchana Gadchiroli 37(2)

अधिसूचना
महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ७ एप्रिल, २०१०

**महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगर रचना अधिनियम, १९६६**

क्रमांक: टीपीएस २४०८/२२२५/प्र.क्र.६२/०२/नवि-९:- ज्याअर्थी, विकास योजना गडचिरोली, संचालक नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अधिसुचना क्र. विगो/गडचिरोली/टीपीव्ही-२/५०८४, दिनांक २० जुलै, १९९१ अन्वये मंजूर झाली असुन ती दिनांक ५ ऑक्टोबर, १९९१ पासून अंमलात आलेली आहे. (यापुढे "उक्त विकास योजना" असे संबोधले आहे);

आणि ज्याअर्थी, उक्त योजनेत मौजा गडचिरोली येथील सर्व्हे क्र. ५७७/१ (नविन सर्व्हे क्र. ७३१) मधील सुमारे १.२० हेक्टर क्षेत्र ना विकास विभागात समाविष्ट आहे (यापुढे "उक्त क्षेत्र" असे संबोधिले आहे) ;

आणि ज्याअर्थी, गडचिरोली नगर परिषदेने (यापुढे "उक्त नगर परिषद" असे संबोधिले आहे) उक्त क्षेत्र ना विकास विभागातून वगळून रहिवास विभागात समाविष्ट करण्याचा फेरबदल प्रस्ताव (यापुढे "उक्त फेरबदल प्रस्ताव" असे संबोधिले आहे) महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ (१९६६ चा महाराष्ट्र अधिनियम क्र. ३७ वा) (यापुढे "उक्त अधिनियम" असे संबोधिले आहे) चे कलम ३७ (१) अन्वये विहित वैधानिक कार्यवाही पूर्ण करुन शासनाच्या मान्यतेसाठी सादर केला आहे ;

आणि ज्याअर्थी, आवश्यक त्या चौकशीनंतर व संचालक नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा सल्ला घेतल्यानंतर उक्त फेरबदल प्रस्ताव आवश्यक असल्याचे व तो काही अटींसह व बदलांसह मंजूर करणेबाबत शासनाचे मत झाले आहे ;

आता, त्याअर्थी, उक्त अधिनियमाचे कलम ३७ चे पोटकलम (२) अन्वये असलेल्या अधिकारांचा वापर करुन उक्त विकास योजनेतील उक्त फेरबदल प्रस्तावास काही अटींसह व बदलांसह मंजूरी देण्यात येत आहे आणि त्यासाठी उक्त विकास योजना मंजूरीची उपरोल्लिखित दिनांक २० जुलै, १९९१ ची अधिसूचना सुधारित करण्यात येत आहे;

विकास योजना मंजूरीच्या अधिसूचनेच्या फेरबदल सूचीतील शेवटच्या नोंदीनंतर पुढील नव्या नोंदीचा समावेश करण्यात येत आहे-

# नोंद

"मौजा गडचिरोली येथील सर्व्हे क्र. ५७७/१ (नविन सर्व्हे क्र. ७३५) मधील (३०.०० मी. रस्ता सोडता उर्वरीत) क्षेत्र खालील अटीवर ना विकास विभागातून वगळून नकाशात दर्शविल्याप्रमाणे रहिवास विभागात समाविष्ट करण्यात येत आहे-

अट:- ५०% अनिवार्य खुल्या जागेव्यतिरिक्त १०% इतके क्षेत्र सार्वजनिक सुविधाकरीता (ॲमेनिटी स्पेस) प्रस्तावित रेखांकनात राखून ठेवणे अर्जदार / विकासकर्त्यास बंधनकारक राहील व सदर सुविधा क्षेत्राचा विकास अर्जदार / विकासकर्त्यांना करता येईल."

टिप:- १) उपरोक्त फेरबदल दर्शविणाऱ्या भाग नकाशाची प्रत मुख्याधिकारी, गडचिरोली नगर परिषद, जिल्हा गडचिरोली यांच्या कार्यालयात कार्यालयीन वेळेमध्ये नागरिकांच्या अवलोकनार्थ एक महिन्याच्या कालावधीसाठी ठेवण्यात आली आहे.

२) सदर अधिसूचना विभागाच्या w.w.w.urban.maharashtra.gov.in या वेबसाईटवर देखील उपलब्ध आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( प्रदीप गोहिल )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

## NOTIFICATION

**Government of Maharashtra**
**Urban Development Department**
**Mantralaya, Mumbai 400 032.**
**Dated: 7th April, 2010**

*The Maharashtra Regional & Town Planning Act, 1966.*

**No. TPS-2408/2225/CR-62/09/UD-9:-** Whereas, the Development Plan of Gadchiroli has been sanctioned vide Director of Town Planning Maharashtra State, Pune's Notification No. Development Plan Gadchiroli/TPV-2/5084, Dated 20th July, 1991 and has come into force with effect from dt. 1st November, 1991 (hereinafter referred to as the "said Development plan");

And whereas, in the said Development Plan the land bearing Survey No. 577/1 (New Survey No. 731) of Mouje Gadchiroli admeasuring about 1.20 Ha. is shown in the No Development Zone (hereinafter referred to as "the said Land");

And whereas, Gadchiroli Municipal Council (hereinafter referred to as the "said Municipal Council") after following all the legal formalities stipulated under section 37 (1) of the Maharashtra Regional and Town Planning Act. 1966 (Maharashtra Act No. XXXVII of 1966) (hereinafter referred to as the "said Act") has submitted to Government for sanction a proposal to delete the said Land from No Development Zone and to include the land so released in Residential Zone (hereinafter referred to as the "said Modification Proposal") ;

And whereas after making necessary enquiries and consulting the Director of Town Planning, Maharashtra State, Pune Government is satisfied that the said Modification Proposal is necessary and should be sanctioned with some conditions and changes ;

Now therefore, in exercise of the powers conferred under sub section (2) of the section 37 of the said Act, Government hereby sanctions the said Modification Proposal with some conditions and changes and for that purpose amends the above referred Notification dated 20th July, 1991 as follow :-

In the Schedule of Modification appended in the Notification sanctioning the said Development Plan, following new entry shall be added after last entry-

## ENTRY

"the land bearing Survey No. 577/1 (New Survey No. 731) of Mouje Gadchiroli (excluding 30.00 mt. wide road) is deleted from No Development Zone and land so released is included in Residential Zone as shown in the plan subject to following condition-

**Condition:-** It is compulsory for the applicant / developers to keep 10% area for public amenity in addition to 10% compulsory open space in proposed layout. And this amenities space shall be developed by applicant / developers.

**Note:-**

1) A copy of the part plan of aforesaid sanctioned modification is available in the office of the Chief Officer, Gadchiroli Municipal Council, Dist. Gadchiroli during office hours on all working days for inspection of public for the period of one months.

2) This notification is also available on departments web site www.urban.maharashtra.gov.in

**By order and in the name of the Governor of Maharashtra.**

**(Pradeep Gohil)**
**Section Officer**